मुंबई मेट्रो मार्ग ६ (स्वामी समर्थ नगर-जोगेश्वरी-विक्रोळी) प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या मुद्दालाची प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता नविन लेखाशिर्षे उघडण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२१/प्र.क्र.५३/नवि-७
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी, २०२२.

प्रस्तावना:-

मुंबई मेट्रो मार्ग-६ (स्वामी समर्थ नगर-जोगेश्वरी-विक्रोळी) या एकूण लांबी १४.५ कि.मी, स्थानके-१३ व अंदाजित रु. ६७१६ कोटी किंमतीच्या प्रकल्पाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी येत आहे. शासनाने सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीस नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१६/प्र.क्र.१४०/नवि-७, दिनांक २१ डिसेंबर, २०१७ अन्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पाच्या मंजूर वित्तीय आराखड्यानुसार प्रकल्पावरील केंद्रीय कराच्या ५० टक्के व राज्य शासनाचे कर (१०० टक्के) तसेच जमिनीची किंमत याकरीता एकूण रु.१८२०.५९ कोटी इतके दुय्यम कर्ज राज्य शासनाकडून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला उपलब्ध करावयाचे आहे. नगर विकास शासन निर्णय क्र. एमआरडी-३३१७/प्र.क्र.१३८/नवि-७, दिनांक ०२ नोव्हेंबर, २०१८ अन्वये मुंबई मेट्रो मार्ग-६ साठी राज्य शासनाकडून द्यावयाचे दुय्यम कर्ज हे बिनव्याजी स्वरूपात देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदरचे दुय्यम कर्ज निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्यासाठी तसेच सदर कर्जाच्या मुद्दलाची प्राधिकरणाकडून राज्य शासनाला परतफेड करण्यासाठी नवीन लेखाशीर्षे उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

मुंबई मेट्रो मार्ग ६ (स्वामी समर्थ नगर-जोगेश्वरी-विक्रोळी) प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या मुद्दालाची प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता नविन लेखाशिर्षे उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| **अ) खर्चाचे लेखाशिर्ष- मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका-६ प्रकल्पाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज वितरित करण्यासाठी** | | | |
| | **Demand F-7** | | **मागणी क्र. एफ-७** |
| 6217 | Loans For Urban Development | ६२१७ | नगर विकासासाठी कर्जे |
| 01 | State Capital Development | ०१ | राज्य भांडवली विकास |
| 190 | Loans to Public Sector and other Undertakings | १९० | सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00) (07) | Sub-ordinate Debt to MMRDA for Mumbai Metro Rail Line- 6 Project (State) (Scheme) | (००)(०७) | मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका-६ प्रकल्पाकरिता एमएमआरडीएला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज (राज्य) (कार्यक्रम) |
| | CRC (62170966) | | सांकेतांक (६२१७०९६६) |
| 55 | Loans and Advances | ५५ | कर्जे व आगाऊ रकमा |
| **ब) जमेचे लेखाशीर्ष- मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका- ६ प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाकडून देण्यात आलेल्या दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची वसुलीकरण्यासाठी** | | | |
| | **F-7** | | **एफ-७** |
| 6217 | Loans For Urban Development | ६२१७ | नगर विकासासाठी कर्जे |
| 01 | State Capital Development | ०१ | राज्य भांडवली विकास |
| 190 | Loans to Public Sector and other Undertakings | १९० | सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00)(06) | Recovery of Principal of Sub-ordinate Debt to MMRDA for Mumbai Metro Rail Line- 6 project | (००)(०६) | मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका- ६ प्रकल्पासाठी एमएमआरडीएला दिलेल्या दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची वसुली |
| | CRC (6217512601) | | सांकेतांक (६२१७५१२६०१) |
| 55 | Loans and Advances | ५५ | कर्जे व आगाऊ रकमा |

**०२.** उक्त नमूद नवीन लेखाशिर्षे २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून अंमलात येतील.

**०३.** सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच महालेखाकार कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि./चा-१ नगर विकास विभाग/यूओआर-१२४/२०२१-२२/६०७, दिनांक ०८.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२२४१४४८०२५१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PATIL PRAVIN MAHAVIR

Digitally signed by PATIL PRAVIN MAHAVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae3762dab5d767c62f9fb0fae114632b64ca093aee08f2cbb0e78c2aa4f92854, pseudonym=3BAF2344FF588545AA36E8B41C6027EC4D169313, serialNumber=DD1267A21819BDF95A0C671B82E8A167AC5CAB5DBAA70510E0FB9547D020F5C2, cn=PATIL PRAVIN MAHAVIR
Date: 2022.02.25 11:38:51 +05'30'

**(प्रविण पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/ऋण व हमी/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, नवि-४/५/३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. लेखा अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती, नवि-७.